चिखलदरा (जि.अमरावती) पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई-२००८/प्र.क्र.३७८/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ०९ ऑगस्ट, २०१०.

संदर्भ :- १) शासन निर्णय, ग्रा.वि.व ज.सं. विभाग, क्र. पंसई-२००७/प्र.क्र.१७३/पंरा-७,दि.२७.११.२००७
२) कार्यकारी अभियंता(बांध),जि.प.,अमरावती यांचे पत्र क्र.जिप/बांध/तां.३/२९८३/०८, दि.१५.१०.२००८

प्रस्तावना :-

कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद,बांधकाम विभाग, अमरावती यांनी चिखलदरा पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची संदर्भीय पत्रान्वये विनंती केलेली आहे.

कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद,बांधकाम विभाग, अमरावती यांनी त्यांच्या वरील प्रस्तावात नमूद केले आहे की, चिखलदरा पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या बांधकामासाठी सन २००४-०५ च्या दरसुचीवर आधारीत रु. ७८.०० लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास दिनांक २७.११.२००७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली. त्यानुसार कामाचे सविस्तर अंदाजपत्रक तयार करुन तांत्रिक मंजूरीसाठी अधिक्षक अभियंता सा.बां.मंडळ, अमरावती यांच्याकडे सादर करण्यात आले होते. तथापि, सविस्तर अंदाजपत्रकीय किंमत ही मुळ किंमतीपेक्षा १० टक्याहून अधिक असल्यामुळे त्यास अधिक्षक अभियंता सा.बां. मंडल, अमरावती यांनी तांत्रिक मंजूरी दिली नाही. त्यामुळे सदर इमारतीच्या बांधकामासाठी मुख्य वास्तुशास्त्रज्ञ सा.बां.मुंबई यांच्याकडील T-ADM/५५११ या टाईप प्लॅननुसार ८३६.४२ चौ.मी.जोता क्षेत्रफळाकरीता मुख्य अभियंता प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे परिपत्रक क्र.का.२(३)/इमा/जोता दर २००८/२८७/३८३९, दिनांक ६/१२/०७ नुसार दर घेऊन व त्यावर १० टक्के मेळघाट क्षेत्रासाठी अधिक तसेच १५ टक्के भविष्यातील वाढ धरुन रु.१,३५,६४,२८०/- एवढया किंमतीचे अंदाजपत्रक तयार करण्यात आले आहे. सदर अंदाजपत्रक उप अभियंता, बांध,जि.प.उपविभाग धारणी यांनी तयार केले असून, कार्यकारी अभियता,जि.प.बांधकाम विभाग, अमरावती यांनी साक्षांकित केले आहे. चिखलदरा पंचायत समितीचे अस्तित्वातील प्रशासकीय इमारतीचे बांधकाम जीर्ण झालेले असल्याने, त्या ठिकाणी नविन प्रशासकीय इमारत बांधकामासाठी कार्यकारी अभियंता, जि.प., बांधकाम विभाग, अमरावती यांनी सादर केलेला सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

शासन निर्णय :-

चिखलदरा पंचायत समितीच्या नविन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामासाठी संदर्भीय दिनांक २७.११.२००७ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेमधील किंमतीमध्ये रु.५६.४१ लक्ष एवढ्या रक्कमेची वाढ करुन, एकूण रु.१,३४,४१,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी चौतीस लक्ष एक्केचाळीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास या आदेशान्वये खालील अटीच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.:-

(१) नियोजित चिखलदरा पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामाच्या नमुना आराखड्यात शासन मान्यतेशिवाय कोणताही फेरबदल करु नये.

(२) अपंगांना सोयी-सुविधा पुरविण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व स्वच्छतागृह सुविधा तसेच आगप्रतिबंधक सुविधा प्रशासकीय इमारतीमध्ये बसविणे बंधनकारक राहील.

(३) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास सु-सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने मंजूर किंमतीतच बांधकाम पूर्ण करण्याची दक्षता कार्यकारी अभियंता यांनी घ्यावी.

(४) या कामावर सुप्रमा पेक्षा अधिक खर्च झाल्यास तो जिल्हा परिषद/पंचायत समितीने सोसावा.

(५) वित विभागाने निर्देशित केल्याप्रमाणे प्रस्तुतचे काम कार्यारंभ आदेशाच्या दिनांकापासून १२ महिन्यात पूर्ण करणे बंधनकारक राहील.

(६) प्रस्तुत बांधकामचा त्रैमासिक प्रगती अहवाल त्या-त्या वेळी शासनास सादर करण्याची जबाबदारी कार्यकारी अभियंता (बांधकाम), जि.प.अमरावती यांची राहील.

२.	चिखलदरा पंचायत समितीच्या मुळ प्रशासकीय मान्यता व सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकाचा तुलनात्मक गोषवारा पुढील प्रमाणे आहे :-

| Sr. | Item | As per A.A. (Rs.) | As per Revise AA (Rs.) |
|---|---|---|---|
| 1 | Cost of Building | 5972000.00 | 10581000.00 |
| 2 | Add for Internal road | 1100000.00 | 500000.00 |
| 3 | Add for Hall Stage | 100000.00 | 0.00 |
| 4 | Add for Land Leveling | 100000.00 | 50000.00 |
| 5 | Add 11% Electrification | 66000.00 | 1164000.00 |
| 6 | Add 10% Water Supply & Sanitation | 48000.00 | 846000.00 |
| 7 | Add Contingencies | 300000.00 | 300000.00 |
| 8 | Add 2% Computarisation | 114000.00 | 0.00 |
| | **Total Rs.** | **7800000.00** | **13441000.00** |

३.	चिखलदरा पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या बांधकामासाठी माहे जानेवारी,२००८ मध्ये वितरीत करण्यात आलेला रु.३९.२५ लक्ष इतका निधी वगळून, सुधारीत प्रशासकीय मान्यतेनुसार उर्वरित निधी अनुदानाच्या स्वरुपात व उपलब्धतेनुसार वितरीत केला जाईल.

४.	यावरील खर्च "२५१५ इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३)" या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकरण्यात यावा. यासाठीचा निधी उपलब्धतेनुसार, अर्थसंकल्प वितरण प्रणाली (B D S) अन्वये संगणकाद्वारे वितरीत करण्यांत येईल.

५.	प्रस्तुतचा शासन निर्णय, प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ च्या भाग-पहिला, उप विभाग-पाच, अ.क्र. ९, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ मधील तरतुदीनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१६३/१०/व्यय-१५, दिनांक २७.७.२०१० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६.	प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या http://maharashtra.gov.in या वेबसाईटवर अपलोड करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००८०२१७५२५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या ओदशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,
१) विभागीय आयुक्त अमरावती विभाग, अमरावती.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती.
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती .
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद अमरावती .
६) कोषागार अधिकारी, जिल्हा अमरावती .
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा अमरावती विभाग, अमरावती .
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा अमरावती .
१०) श्री.केवलराम तुळशीराम काळे, वि.स.स.यांना त्यांच्या दिनांक १६.४.२०१० च्या पत्राच्या संदर्भात
११) सभापती, पंचायत समिती, चिखलदरा, अमरावती
१२) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, चिखलदरा, अमरावती
१३) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४) नियोजन विभाग (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत ३).
१६) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१७) निवड नस्ती कार्यासन क्र.पं.रा.७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.